**Convertion in Regular Temparary Establishment:-Shri.Ratan.s.Pawar working under Superintending Engineer, Buldhana Irrigation project Circle, Buldhana**

**कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदाचे अस्थायी आस्थापनेवरील पदामध्ये रुपांतरण अधिक्षक अभियंता,बुलढाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ,बुलढाणा-श्री. रतन शेषराव पवार, मजूर**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग,

शासन निर्णय क्रमांक : एसयुटी-२००९ /(११६/०९)/आ (कामगार )

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांकः- १४/०९/२०११

पहावे:-:१) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रः- रु.अ.आ- १५९६/२२८/ सेवा- ५, दिनांक २४.४.२००१.

२) अधिक्षक अभियंता,बुलढाणा_ पाटबंधारे प्रकल्प मंडळ यांचे पत्र क्रः-४९७२/आर/२००९, दिनांक-२५.०९.२००९.

**प्रस्तावना** :-

श्री.रतन शेषराव पवार,मजूर,हे दिनांक ०१/११/१९८७ पासून रोजंदारी मजूर म्हणून उपविभागीय अधिकारी, लघु पाटबंधारे बांधकाम उपविभाग,मंगरुळपीर येथे कामावर होते. परंतु काम नसल्यामुळे श्री.रतन पवार,हयांना मार्च १९९३ पासून कमी करण्यात आले. त्यानंतर त्यांनी कामावर सामावून घेण्यासाठी मा.औद्योगिक न्यायालय,अमरावती येथे दावा क्र. यु.एल.पी.-५८४/९४ दाखल केला. सदर दाव्याचा निकाल दि. ०९/०८/१९९४ रोजी लागला. त्यानुसार श्री.रतन शेषराव पवार, हयांना पुढील आदेश होईपर्यंत अर्जदाराच्या सेवा खंडीत करू नये असा अंतरिम निर्णय दिला. त्यानंतर मा.औद्योगिक न्यायालयाने दि.०६.०९.१९९५ रोजी अर्जदाराने प्रत्यक्ष काम केल्याच्या दिवसाचे हजेरीपट ठेवावे आणि काम केलेल्या दिवसाचा पगार देण्यात यावा,असा निर्णय दिला. मा.औद्योगिक न्यायालयाच्या निर्णयानुसार क्षेत्रिय कार्यालयाने श्री.रतन शेषराव पवार यांना दि.१६/११/१९९५ रोजी पुनश्च कामावर घेतले. नंतर सदर दावा मा.औद्योगिक न्यायालय, जळगाव येथे हस्तांतरित होवुन नविन यु.एल.पी क्र-१६०/१९९५ प्राप्त झाला. सदर दाव्याचा दि. २३/०२/२००६ रोजी निर्णय झाला. सदर निकालानुसार यु.एल.पी.-५८४/९४ चा निर्णय ग्राहय धरुन श्री.रतन पवार हयांची सेवा नियमित करण्यासाठी सन २००४ साली पाठविलेल्या प्रस्तावास त्वरीत मंजूरी घेवून त्याअनुषंगाने सर्व फायदे देण्याबाबत निर्णय दिला. सदर निर्णयानुसार श्री.पवार यांना दिनांक-०१/११/१९८७ पासून सेवासातत्यासह रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा प्रस्ताव शासनाकडे पाठविलेला आहे. श्री.पवार यांचे आता कोणतेही न्यायालयीन प्रकरण प्रलंबित नाही. श्री.रतन पवार हयांनी त्यांना मिळणा-या थकबाकीपैकी दि-१७/११/२००० ते रुपांतरीत अस्थायी आस्थापनेचे आदेश निर्गमित होतील त्या तारखेपर्यंत २० टक्के थकबाकी शासनास स्वेच्छेने सोडण्याबाबत हमीपत्र सादर केले आहे. त्यानुसार मा.औद्योगिक न्यायालय,जळगाव हयांच्या निर्णयाप्रमाणे श्री.पवार यांना सेवासातत्यासह रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णयः-**

अधिक्षक अभियंता, बुलढाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ अंतर्गत श्री.रतन शेषराव पवार,मजूर,यांना त्यांच्या

नावांसमोर दर्शविल्याप्रमाणे त्यांनी धारण केलेले तत्सम पद खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ क्र . | कर्मचा-याचे नांव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.रतन शेषराव पवार | रोजंदारी | मजूर ०१/११/१९८७ | ०१/११/१९९२ | मजूर | रु.७५०-९४० (जूनी) रु.२५५०-३२०० (५ वा वेतन आयोग ) |

३. श्री.रतन शेषराव पवार, यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदाकरीता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान / कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यात येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीव्यतिरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यात येत आहे.

४. अधिक्षक अभियंता,बुलढाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बुलढाणा यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत, याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करून ते संबंधित कर्मचा-याच्या निदर्शनास आणावेत. तपशीलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे, तो दिनांक,इत्यादी बाबी नमूद कराव्यात.त्यामध्ये कोणतीही चूक अथवा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिका-याने अशी बाब तात्काळ शासनाच्या निदर्शनास आणावी. क्षेत्रिय अधिका-याने सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करू नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-यांच्या व्यक्तिशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशाच्या बाबतीत संबंधित कर्मचा-याची (नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याचा दिनांकात दुरूस्ती इत्यादी बाबी) कोणतीही तक्रार नसल्यास त्यांच्याकडून तशा आशयाचे प्रपत्र "ब"मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र (Undertaking )घेऊन ते त्या कर्मचा-याच्या सेवापटात / सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनाला सादर केला जाईल, याबाबत संबंधित अधीक्षक अभियंत्यानी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत / त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-याची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरूपात घेण्यात यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरूस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनास सादर केला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरूस्ती प्रस्ताव पाठविताना संबंधित कर्मचा-याच्या नेमणूकांच्या आदेशांच्या प्रती, नाममात्र हजेरीपटाच्या प्रती आणि सेवापट पाठविण्याची दक्षता घ्यावी.

५. श्री.रतन शेषराव पवार, यांची वेतननिश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी आणि त्यांच्या थकबाकीची परिगणना त्यानुसार करावी,तथापि श्री.रतन पवार हयांनी

त्यांना मिळणा-या थकबाकीपैकी दि-१७/११/२००० ते सदर आदेश निर्गमित झाल्याच्या तारखेपर्यंतची २० टक्के थकबाकी शासनास स्वेच्छेने सोडण्याबाबत हमीपत्र सादर केले आहे. यास्तव सदर रक्कम त्यांना अदा करण्यात येवू नये. सदर थकबाकीपैकी दि.- ३१ ऑगस्ट २००० पुर्वीची रक्कम दहा वार्षिक समान हफ्त्यात भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करावी. जमा केलेल्या रकमेस ३ वर्षे पुर्ण झाल्यानंतर ती रक्कम आहरणासाठी पात्र राहील. दि.३१ ऑगस्ट २००० नंतरची थकबाकीची रक्कम रोखीने व धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी. परंतू सदर रकमेवर भविष्य निर्वाह निधीशी सबधित व्याज वगळता अन्य कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही आणि संबंधित कर्मचा-याकडून भविष्यात व्याजाबाबतची मागणी करण्यात येणार नाही, अश्याप्रकारचे प्रतिज्ञापत्र लिहून घेणे बंधनकारक राहील.

६. या आदेशान्वये रूपांतरीत करण्यात आलेल्या कर्मचा-यांच्या वेतनापोटी होणारा खर्च सन २०११ ते २०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशीर्षाखालील मंजूर अनूदानातून भागविण्यात यावा.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. रूअआ- १५९६/२२८/सेवा -५, दिनांक २४.०४.२००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून काढण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय www.maharastra.gov.in हया संकेत स्थळावर २०११०९१४१५१११७००१ हया सांकेतांक क्रमांकावर प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

अ.अ.कोदे

**( अ.अ.कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

प्रत सहपत्रासहित अग्रेषित :-
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा
वित्त विभाग, (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
अधिक्षक अभियंता,बुलढाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बुलढाणा
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र-२,अकोला.
निवडनस्ती /आस्थापना (कामगार ) संग्रहार्थ